**महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ संवर्गातील विभागीय आयुक्त कार्यालयातील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) (एस-२७) संवर्गातील उप आयुक्त (आस्थापना) व उप आयुक्त (विकास) या पदाच्या पदनामामध्ये बदल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः RDD-१३०११/७८/२०२५/आस्था-३**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट
मुंबई-४००००१
दिनांक : १३ मे, २०२५

**वाचा:**

1) **ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक मविसे-१०/प्र.क्र.२५८/२०१२/आस्था-३, दिनांक २५ ऑक्टोबर, २०१३**

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ संवर्गातील विभागीय आयुक्त कार्यालयातील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) (एस-२७ : १२३१००-२१५९००) अधिकाऱ्यांची प्रत्येकी उप आयुक्त (आस्थापना) व उप आयुक्त (विकास) ही दोन पदे, अशी ६ विभागीय आयुक्त कार्यालयात एकुण १२ पदे, वाचा येथील अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये चिन्हांकित करण्यात आलेली आहेत. महाराष्ट्र विकास सेवा, राजपत्रित अधिकारी संघटना यांच्याकडून विभागीय आयुक्त कार्यालयातील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) (एस-२७) या संवर्गातील पदांच्या पदनामामध्ये उप आयुक्त (आस्थापना) ऐवजी अपर आयुक्त (आस्थापना), व उप आयुक्त (विकास) ऐवजी अपर आयुक्त (विकास) असा बदल करण्याबाबत वारंवार मागणी करण्यात येत होती. त्यानुषंगाने महाराष्ट्र विकास सेवेतील विभागीय आयुक्त कार्यालयातील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) (एस-२७ : १२३१००-२१५९००) या संवर्गातील उप आयुक्त (आस्थापना) व उप आयुक्त (विकास) पदांच्या पदनामामध्ये बदल करण्याचे शासनाच्या विचाराधिन होते. उपरोक्त बाबीस अनुसरुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ संवर्गातील विभागीय आयुक्त कार्यालयातील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) (एस-२७ : १२३१००-२१५९००) अधिकाऱ्यांच्या पदनामाध्ये खालील तक्त्यात नमुद केल्या प्रमाणे बदल करण्यात येत आहे.

| अ.क्र | संवर्ग | सध्याचे पदनाम | सुधारित पदनाम |
|---|---|---|---|
| १ | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी), (एस-२७ : १२३१००-२१५९००) | उप आयुक्त (आस्थापना) | अपर आयुक्त (आस्थापना) |
| | | उप आयुक्त (विकास) | अपर आयुक्त (विकास) |

२. उप आयुक्त (आस्थापना) व उप आयुक्त (विकास) यांच्या पदनामातील उपरोक्त बदल खालील अटींच्या अधिन राहुन करण्यात येत आहे.

१) वरीलप्रमाणे पदनाम बदलामुळे कोणतीही वेगळी वेतनश्रेणी वा वेतनवाढ देय होणार नाही. तसेच भविष्यात सध्या लागू असलेल्या वेतनस्तर/वेतनश्रेणी पेक्षा वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करण्याची मागणी करता येणार नाही.

२) सातव्या वेतन आयोगानुसार वेतन संरचना (एस-२७ : १२३१००-२१५९००) पदनाम बदलानंतर कायम राहील.

३) वरीलप्रमाणे पदनाम बदलानंतर पदांच्या दर्जामध्ये कोणताही बदल होणार नाही.

४) उपरोक्त प्रमाणे पदनाम बदलानंतर अन्य संवर्गातील त्याच पदनामासाठी असणारी वेतन संरचना देण्याच्या अनुषंगाने भविष्यात वेतनत्रुटी समितीपुढे मागणी करता येणार नाही व अशी मागणी विचारात घेतली जाणार नाही.

५) सदर पदांसाठी सध्या अस्तित्वात असलेले सेवा प्रवेश नियम पदनाम बदलानंतर देखील लागू राहतील. सेवाप्रवेश नियमांमध्ये पदांच्या नावात बदल यथावकाश करण्यात येईल.

६) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) (एस-२७ : १२३१००-२१५९००) या संवर्गातील उप आयुक्त (आस्थापना) व उप आयुक्त (विकास ) या पदांसाठी जी कर्तव्ये व जबाबदाऱ्या नमुद केलेल्या आहेत, तीच कर्तव्ये व जबाबदाऱ्या बदललेल्या पदनामासाठी कायम राहतील. पदनाम बदलामुळे कर्तव्य व जबाबदाऱ्यांमध्ये कोणताही बदल होणार नाही.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग व सामान्य प्रशासन विभाग यांनी दर्शविलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५१३१७५४४३०७४४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2025.05.13 17:55:39 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलाबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (ग्राम विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७. विभागीय आयुक्त, सर्व.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व
९. प्रधान महालेखाकार (लेखा आणि हक्क) - I व II, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०. सह/उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
११. सह/उप सचिव (का. व्यय-१५/सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. उप सचिव (का.१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
१४. संचालक, पेसा कक्ष, पुणे.
१५. अतिरिक्त संचालक, राज्य व्यवस्थापनक कक्ष, राष्ट्रीय ग्राम स्वराज्य अभियान, पुणे.
१६. अतिरिक्त संचालक तथा मुख्य परिचालन अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवन्नोनती अभियान, सीबीडी बेलापूर.

१७. मुख्य परिचालन अधिकारी (कौशल्य),दीनदयाळ उपध्याय ग्रामीण कौशल्य योजना, सीबीडी बेलापूर.

१८. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण संस्था, सर्व

१९. सर्व कार्यासने, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई

२०. निवडनस्ती (का.आस्था-३), बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई